**बीड जिल्हयातील श्री. क्षेत्र परळी वैजनाथ ज्योर्तिलिंग विकास आराखडयास मंजूर देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमयुएम-२०१८/प्र.क्र.३४३/नवि-१७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १५ जानेवारी, २०१९

वाचा :-१) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र. तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का.-१४४४, दि.०४ जून, २०१५.
२) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र. तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का.-१४४४, दि.१९ जुलै, २०१६.
३) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हास्तरीय समिती, बीड यांचे पत्र क्र.जिनिस/पर्यटन-तीर्थक्षेत्र/२०१८-१९/१०९७, दि.२३.०८.२०१८.
४) मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि.२०.१२.२०१८ रोजी संपन्न झालेल्या शिखर समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

नियोजन विभाग, शासन निर्णय, दि.०४.०६.२०१५ नुसार राज्यातील तीर्थक्षेत्र, पर्यटनस्थळ-परिसर विकास आराखडा अंतिम करणे व अंमलबजावणीसाठी धोरण/मार्गदर्शक तत्त्वे निश्चित करण्यात आली आहेत. या शासन निर्णयानुसार जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हास्तरीय कार्यकारी समिती, मा. पालकमंत्री यांचे अध्यक्षतेखाली जिल्हास्तरीय समिती, मा. मुख्य सचिव महोदय यांच्या अध्यक्षतेखाली उच्चाधिकार समिती आणि मा. मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय शिखर समिती, अशा समित्या गठीत करण्यात आलेल्या आहेत.

तद्नुसार जिल्हाधिकारी, बीड यांनी उपरोक्त नमुद शासन निर्णयातील कार्यपध्दतीनुसार जिल्हाधिकारी, बीड यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय कार्यकारी समितीच्या दि. २४.०७.२०१८ रोजीच्या बैठकीत, तर मा.पालकमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीच्या दि. १३.०८.२०१८ रोजीच्या बैठकीत मंजूरी घेवून, श्री. क्षेत्र वरळी वै. ज्योतिर्लिंग, जि.बीड या तीर्थक्षेत्र विकासाचा रु. १३३.५८ कोटी इतक्या रकमेचा आराखडयास मंजूरी देण्याचा प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केला होता.

मा. मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखालील शिखर समितीच्या दि.२०.१२.२०१८ रोजी पार पडलेल्या बैठकीच्या इतिवृत्तानुसार श्री. क्षेत्र परळी वैजनाथ ज्योर्तिलिंग विकास आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :

बीड जिल्हयातील श्री. क्षेत्र परळी वै. ज्योतिर्लिंग या तीर्थक्षेत्र विकासाच्या रु. १३३.५८ कोटी इतक्या रकमेच्या यासोबत जोडलेल्या **विवरणपत्र-अ** मध्ये दर्शविलेल्या कामांस/ आराखड्यास खाली नमुद अटी व शर्तीच्या अधीन राहुन प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. सदर निर्णयाव्दारे देण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या रकमेमध्ये वस्तु व सेवा कर (जी.एस.टी.) अंतर्भूत आहे.

२. सदर आराखडयातील **विवरणपत्र-अ** मध्ये दर्शविलेल्या कामांपैकी सोबत जोडलेल्या **विवरणपत्र-ब** मध्ये दर्शविलेल्या कामांसाठी चालु आर्थिक वर्षात **"४२१७ वैशिष्टयपूर्ण योजना"** या लेखाशिर्षाखाली रु.२० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

३. विवरणपत्र-ब मधील कामांसाठी कार्यान्वयीन यंत्रणा म्हणून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बीड यांना मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर आराखडयाच्या अंमलबजावणीसाठी जिल्हाधिकारी, बीड हे **संनियंत्रण अधिकारी** असतील.

५. सदर आराखडयातील प्रत्येक कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकांना जिल्हाधिकारी, बीड यांनी सक्षम अधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता घेण्यात आल्याची खात्री करावी.

६. जिल्हाधिकारी, बीड यांनी प्राधान्याने करावयाच्या कामांसाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव भागनिहाय सादर करावा.

७. सदर आराखडयातील कामे करतांना ज्या जमिनीवर कामे करण्यात येणार आहे, त्या जागेसंदर्भात आवश्यकतेनुसार आवश्यक ते ना-हरकत घेणे आवश्यक आहे.

८. आराखडयाची अंमलबजावणी करतांना शिखर समितीच्या मान्यतेशिवाय मंजूर आराखडयातील कामांव्यतिरिक्त कोणतेही काम समाविष्ट करता येणार नाही.

९. सदर आराखडयातील कामांसाठी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या शासकीय निधीच्या खर्चाबाबत वित्त विभाग व नियोजन विभागाने वेळोवेळी शासन निर्णय / परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना/ निर्देशांची जिल्हाधिकारी, बीड यांनी काटेकोर अंमलबजावणी करावी.

१०. सदर आराखडयातील कामांसाठी होणाऱ्या शासकीय खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे विहित कालमर्यादेत शासनास सादर करण्यात यावीत.

२. या आराखडयाच्या प्रयोजनार्थ नियोजन विभागाने अतिरिक्त नियतव्यय टप्प्याटप्प्याने उपलब्ध करुन द्यावा. अतिरिक्त नियतव्ययातून निधी वितरीत करतांना निधी वितरणाच्या आदेशामध्ये सदर आराखडयातील उर्वरीत भागनिहाय कामांसाठी कार्यन्वयीन यंत्रणा घोषित करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११५११०६४८२१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Kailas Madhukar Badhan

Digitally signed by Kailas Madhukar Badhan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=22804d8f98c03e9a67ca8eca6a02e7eaab4bcc4a3d59dfce4f1c7189ab74b085, serialNumber=e83c1c73de120837488d76379734db4868992e2b35ba1df8cfea9650fcff780f, cn=Kailas Madhukar Badhan
Date: 2019.01.15 11:14:44 +05'30'

**( कैलास बधान )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव.
३. मा. पालकमंत्री, बीड यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव.
५. मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव.
६. बीड जिल्हयातील संबंधित संसद सदस्य, विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८. मा. अपर मुख्य सचिव, वित्त/नियोजन/सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर.
१२. विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
१३. जिल्हाधिकारी, बीड.
१४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बीड.
१५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (विद्युत), बीङ
१६. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बीड.
१७. जिल्हा वन अधिकारी, वन विभाग, बीड.
१८. अधिक्षक अभियंता, महावितरण, लातूर.
१९. सहसचिव (नवि-१६)/(नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र पर्यटन महामंडळ,
२१. मुख्याधिकारी, परळी-वैजनाथ नगरपरिषद, परळी, जि. बीड.
२२. निवडनस्ती (नवि-१७).

# श्री. क्षेत्र परळी वैजनाथ ज्योतिर्लिंग विकास आराखड्यातील कामांची संपूर्ण यादी.

## (नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमयुएम-२०१८/प्र.क्र.३४३/नवि-१७, दि.१५.०१.२०१९)

### विवरणपत्र - "अ"

| अ. क्र | विवरण | रक्कम रुपये लाखात |
|---|---|---|
| १ | वैजनाथ मंदिराच्या पुर्वेस हरिहर तिर्था जवळ दर्शन मंडपाचे (दर्शन बारी मधील प्रतीक्षा गृह ) बांधकाम व परिसर सुधारणा करणे.<br>वाहन तळ + ४मजले<br>आकार - ४०' x ३०' - १० हॉल (स्वतंत्र स्वच्छतागृहासह )<br>एकुण बंधकाम क्षेत्रफळ = ४४००.० चौ.मी.<br>परिसर सुधारणा क्षेत्रफळ = ५००.० चौ.मी. | ८१६.७१ |
| २ | जुन्या तहसील च्या जागेवर धर्मशाला / यात्री निवास बांधकाम व परिसर सुधारणा करणे.<br>वाहन तळ + ४ मजले ३२० यात्रेकरुंसाठी<br>आकार - १२' x २०' - ८० खोल्या<br>४ खाट प्रति खोली. ( स्वच्छतागृहासह )<br>एकुण बंधकाम क्षेत्रफळ = ३२००.० चौ.मी.<br>परिसर सुधारणा क्षेत्रफळ = २०००.० चौ.मी. | १११२.५६ |
| ३ | दक्षीण मुखि गणेश मंदिराच्या पठीमागे यात्री निवास बांधकाम व परिसर सुधारणा करणे.<br>वाहन तळ + ४ मजले १६० यात्रेकरुंसाठी<br>आकार - १२' x २०' - ४० खोल्या<br>४ खाट प्रति खोली. ( स्वच्छतागृहासह )<br>एकुण बंधकाम क्षेत्रफळ = १६००.० चौ.मी.<br>परिसर सुधारणा क्षेत्रफळ = ६००.० चौ.मी. | ६५१.४० |
| ४ | शनी मंदिराच्या पठीमागे धर्मशाला / यात्री निवास बांधकाम व परिसर सुधारणा करणे.<br>वाहन तळ + ४मजले<br>८० यात्रेकरुंसाठी<br>आकार - १२' x २०' - २० खोल्या<br>४ खाटा प्रति खोली. ( स्वच्छतागृहासह )<br>एकुण बंधकाम क्षेत्रफळ = २१०.० चौ.मी.<br>परिसर सुधारणा क्षेत्रफळ = १८०.० चौ.मी. | २३५.३४ |
| ५ | विविध ठिकाणी सुलभ शौचालयाचे बांधकाम करणे.<br>१. मेरुगिरी पर्वत<br>२. यात्री निवास<br>३. आन्नछत्र जवळ<br>४. दक्षीण मुखि गणेश मंदिराच्या पठीमागे<br>५. डोंगर तुकाई मंदिर परिसर<br>एकुण बांधकाम क्षेत्रफळ = ६२५.० चौ.मी. | १७०.५० |

| | | |
|---|---|---|
| ६ | मेरु पर्वतावर कॉटेजेस चे बांधकाम व परिसर सुधारणा करणे.<br>जमिन मजला + १ (६ इमारती)<br>एका इमरतीचे बांधकाम क्षेत्रफळ = १८०.० चौ.मी.<br>आकार - १२' x २०' - ८ खोल्या<br>४ खाट प्रति खोली.( स्वच्छतागृहासह ) १९२ यात्रेकरुंसाठी<br>एकुण बंधकाम क्षेत्रफळ = १०८०.० चौ.मी.<br>परिसर सुधारणा क्षेत्रफळ = ७२०.० चौ.मी. | २८१.२३ |
| ७ | मेरु पर्वतावर उपहारगृह बांधकाम करणे.<br>एकुण बंधकाम क्षेत्रफळ = १५०.० चौ.मी. | ३५.७० |
| ८ | मेरु पर्वतावर उद्यान विकसीत करणे.<br>(लॉन, पाथवे, वृक्ष लागवड, विविध फुलांची लागवड इत्यादी तसेच संगीत कारंजे, साऊंड व स्पीकर योजना, लहान मुलांसाठी रेल्वे आणि अंतर्गत विद्युत रोषणाई करणे )<br>एकुण क्षेत्रफळ = ८०००.० चौ.मी. | ३२३.६३ |
| ९ | वैद्यनाथ मंदिर भोवताली दगडी फरशी बसवणे.<br>(उत्तर-पुर्व व दक्षिण बाजुस )<br>एकुण बंधकाम क्षेत्रफळ = ३५००.० चौ.मी. | ६४.२० |
| १० | नगर पलिकेजवळ सुंदर वास्तुशिल्प असे प्रवेशद्वार बाधणे.<br>(१२.० मी. रुंद, प्रवेशद्वार, ४.५ मी. रुंदीच्या दोन कमानी ) | ४२.८० |
| ११ | मेरु पर्वताभोवती संरक्षण भींत बांधकाम करणे.<br>एकुण लांबी = ४५०.० मी. | २६.४८ |
| १२ | मेरु पर्वत पोच रस्ता व भोवती च्या रस्त्यास एका बाजुने अवरोधक भींत बांधकाम करणे.<br>रस्त्याची लांबी = ३५०.० मी. रुंदी - ९.० मी<br>अवरोधक भींत लांबी = १५०.० मी. | ६३.४० |
| १३ | वैजनाथ मंदिराच्या पुर्वेकडील व पश्चिमेकडील सिमेंट कॉक्रेट रस्ता करणे.<br>एकुण लांबी = २००.० मी. रुंदी - ६.० मी. | १९.२६ |
| १४ | वैजनाथ मंदिराच्या पुर्वेकडील व पश्चिमे कडील सिमेंट कॉक्रेट नाली बांधकाम करणे.<br>एकुण लांबी = ४००.० मी. | १३.७० |
| १५ | मेरु पर्वताभोवती प्रदक्षिणा मार्गाचे काम करणे (सिमेंट कॉक्रेट रस्ता व रस्त्याच्या दोन्ही बाजुस सिमेंट कॉक्रेट ची बंदीस्त नाली )<br>एकुण रस्त्याची लांबी = १०००.० मी. रुंदी - ७.० मी.<br>एकुण बंदीस्त नाली लांबी = २०००.० मी. | ३२४.७० |
| १६ | वैजनाथ मंदिराच्या पुर्वेकडील वाहनतळ विकसीत करणे.<br>एकुण क्षेत्रफळ = ९०००.० चौ.मी. | १२५५.६० |
| १७ | हरिहर तिर्था भोवती उद्यान विकसीत करणे, संरक्षण भिंत बांधणे, कारंजे बसविणे, विद्युत रोषणाई करणे.<br>एकुण क्षेत्रफळ= १५००.० चौ.मी. | ४३.१२ |
| १८ | वैजनाथ मंदिराच्या विविध इमारतींवरील व परिसरातील पडणारे पावसाचे पाणी साठवणे व जमीनीमध्ये झिरपवण्याची व्यवस्था करणे.<br>(जल पुनर्भरण करणे) - एकुण ९ इमारती | २८.८९ |
| १९ | पोचरस्त्यासह हेलिप्याड विकसीत करणे. (सिमेंट कॉक्रेट व पेव्हर ब्लॉक )<br>एकुण लांबी = १०००.० मी. रुंदी - ७.० मी. | ४५.२६ |
| २० | मेरुपर्वता भोवती प्रदक्षिणा मार्गावर पदचारी मार्ग करणे (पेव्हर ब्लॉक)<br>लांबी = ८००.० मी. रुंदी - ३.० मी. | ५१.३६ |

| | | |
|---|---|---|
| २१ | मेरुपर्वता भोवती प्रदक्षिणा मार्गावर (पादचारी मार्ग) वर शेडचे काम करणे.<br>लांबी = १०००.० मी. रुंदी - ३.० मी. | ७०.०४ |
| २२ | दर्शन रांगेत स्टेनलेस स्टीलचे प्रतिबंधक रेलींग करणे.<br>एकुण लांबी = १०००.० मी. | ३७.४५ |
| २३ | पिण्याच्या पाण्याची सुविधा (टाक्या व RO फिल्टर मशीन सह) मंदिर परिसरात व बाहेरील परिसरात<br>१. अन्नछत्राजवळ - २<br>२. उत्तरेकडील दुकांनांच्या वरील धर्मशाळा - १<br>३. उत्तरेकडील नवीन धर्मशाळा - २<br>४. कल्याण मंडप धर्मशाळा - २<br>५. पुर्वेकडील दर्शन मंडप - १<br>६. शनीमंदीराजवळील धर्मशाळा - १<br>७. मेरु गिरी उद्यान भक्त निवास - ४<br>८. मुख्य मंदीर परिसर - ४ | १७.०० |
| २४ | पिण्याच्या पाण्याची सुविधा (टाक्या व स्टँड पोस्ट) मंदिर परिसरात व बाहेरील परिसरात<br>१. टाक्या व नळ - ३ टाक्या<br>२. विंधन विहीर - ३ | १२.०० |
| २५ | डोंगर तुकाईदेवी पोच रस्त्याचे काम करणे. (सिमेंट कॉंक्रेट)<br>एकुण लांबी = २१०.० मी. रुंदी - ७.० मी. | ३९.३२ |
| २६ | डोंगर तुकाईदेवी मंदिरा जवळ वाहनतळाची व्यवस्था करणे. (पेव्हर ब्लॉकसह)<br>एकुण क्षेत्रफळ = २०००.० चौ.मी. | २५.६८ |
| २७ | डोंगर तुकाईदेवी मंदिरा भोवती सुरक्षा भिंत व अवरोधक भिंत बाधणे.<br>लांबी = ५००.० मी. | २६.७५ |
| २८ | डोंगर तुकाईदेवी मंदिर परिसरामध्ये सभा मंडप बांधकाम करणे.<br>एकुण बंधकाम क्षेत्रफळ = ६३९.० चौ.मी.<br>क्षमता - ५०० भाविक बसतील असा हॉल | १३६.८७ |
| २९ | डोंगर तुकाईदेवी येथे धर्मशाळा बाधणे.<br>तळ + १ मजला ( दोन इमारती ) २४० यात्रिकरुंसाठी<br>आकार - २५' x १८' - १२ खोल्या<br>२० यात्रेकरू प्रति खोली. ( स्वतंत्र स्वच्छतागृहासह )<br>एकुण बांधकाम क्षेत्रफळ = ७००.० चौ.मी. | १६६.६० |
| ३० | वैजनाथ मंदिराभोवती विविध ठिकाणी पोलिसांकरिता टेहाळणी मनोरे बाधणे.<br>(वॉच टॉवर ४ नग. - १०.० मी. उंचीचे )<br>एका टॉवरचा आकार - ३.० मी. X ३.० मी.<br>एकुण बंधकाम क्षेत्रफळ = ३६.० चौ.मी | १५.८२ |
| ३१ | डोंगर तुकाईदेवी मंदिर परिसरामध्ये उद्यान विकसीत करणे.<br>एकुण क्षेत्रफळ = २०००.० चौ.मी | ३६.३८ |
| ३२ | डोंगर तुकाईदेवी मंदिर येथे भुयारी मार्ग व दोन सुंदर दीपमाळ बांधणे. (काळ्या दगडामध्ये )<br>भुयारी मार्ग लांबी = ३०.० मी.x ३.० मी. | ६२.७२ |

| | | |
|---|---|---|
| ३३ | दक्षिण मुखि गणेश मंदिरा जवळ सभा मंडप बाधणे.<br>आकार - २५.० x १२.० मी. ( स्वच्छतागृहासह )<br>क्षमता - १५० भाविक बसतील असा हॉल<br>एकुण बंधकाम क्षेत्रफळ = ३००.० चौ.मी. | १६५.८८ |
| ३४ | वैजनाथ मंदिर परिसरात विविध ठिकाणी माहिती फलक बसवणे. | २१.४० |
| ३५ | वैजनाथ मंदिर प्रवेशापूर्वी पाय धुण्याची जागा करणे. | २.५० |
| ३६ | निवास खोल्यांमध्ये फर्निचरची व्यवस्था करणे. (२०० खोल्या, ७५२ खाट (३' x ७')<br>२०० टेबल (३' x २'), ४०० खुर्च्या | ३५३.५९ |
| ३७ | भव्य नंदी | २५.०० |
| ३८ | त्रिशूल व डंबरु | ५०.०० |
| ३९ | शहरातील मुख्य ४ रस्त्यांवर कमानी तयार करणे .<br>४ कमानी | ८०.०० |
| ४० | पालखी मार्ग विकसित करणे.<br>वैजनाथ मंदिर ते देशमुख पार पर्यंत रस्ता व नाली करणे. (सिमेंट कॉक्रेट)<br>लांबी = ११०.० मी. व रुंदी - ६.० मी. | १८.७२ |
| ४१ | पालखी मार्ग विकसित करणे.<br>दक्षिण मुखि गणेश मंदिर ते जुने शनी मंदिर आबे वेस रस्ता व नाली करणे. (सिमेंट कॉक्रेट)<br>लांबी = १८०.० मी. व रुंदी - ६.० मी. | २५.५७ |
| ४२ | पालखी मार्ग विकसित करणे.<br>नेहरु चौक ते कालात्री मंदिर मार्गे गणेश पार रस्ता व नाली करणे. (सिमेंट कॉक्रेट)<br>१२.०० मी. लांबी = ७००.० मी. व रुंदी- ७.३० मी. ९.०० मी. लांबी = ४००.० मी. व रुंदी - ५.०० मी. | ४५९.२८ |
| ४३ | पालखी मार्ग विकसित करणे.<br>कालात्रि मंदिर ते बटभैरवनाथ मंदिर पर्यंत रस्ता व नाली करणे. (सिमेंट कॉक्रेट)<br>लांबी = ९६०.० मी. व रुंदी - ६.० मी. | ३३९.१० |
| ४४ | पालखी मार्ग विकसित करणे.<br>बटभैरवनाथ मंदिर ते वैजनाथ मंदिर रस्ता व नाली करणे. (सिमेंट कॉक्रेट)<br>लांबी = १८०.० मी. व रुंदी - ६.० मी. | १५०.६० |
| ४५ | पालखी मार्ग विकसित करणे.<br>बटभैरवनाथ मंदिर जवळील नाल्यावर पूल बांधणे. (सिमेंट कॉक्रेट) | १०३.०१ |
| ४६ | विविध ठीकाणी सुलभ सौचालयाचे बांधणे.<br>१. बस स्थानक परिसर<br>२. रेल्वे स्टेशन परिसर<br>३. जिजामाता उद्याना जवळ<br>४. मार्केट कमिटी परिसर<br>५. डॉ. घुगे दवाखान्या जवळ<br>६. बटभैरवनाथ मंदिर पुला जवळ | १८९.७६ |
| ४७ | वडार वाडा येथील गोडाऊन जवळ प्रसाधन गृह बांधणे.<br>बांधकाम क्षेत्रफळ = ९८.१० चौ.मी. | १९.७० |
| ४८ | अग्निशमन व्यवस्था-<br>प्रदक्षिणा मार्ग व पालखी मार्गा लगत फायर हायड्राट बसवणे. | ४०.०० |

| | | |
|---|---|---|
| ४९ | १२.० मी. उंचीचे हायमास्ट उभारणे.<br>(वैजनाथ मंदिर परिसरामध्ये १२ ठिकाणी) | ६४.२६ |
| ५० | सोलार लाईट बसवणे.<br>(वैजनाथ मंदिर परिसर व पोच रस्त्यांवर २२० खांब) | ९१.६३ |
| ५१ | सोलार वॉटर हीटर बसवणे.<br>(१००० ली. क्षमता - १२ नग ) | ३८.५६ |
| ५२ | सौर ऊर्जा प्रकल्प (५ कि. वॅट. क्षमतेचे ८ संच = एकूण ४०.० कि. वॅट. ) | ६६.६४ |
| ५३ | विद्युत रोहित्र - ४ संच बसवणे व MSEDCL चार्जेस | ६०.०० |
| ५४ | पाणी पुरवठा व्यवस्था (अतिरीक्त) | ५०५.५० |
| ५५ | सांडपाणी प्रक्रिया व्यवस्थापन | १२५.१० |
| ५६ | बेल, रुद्राक्ष व इतर वृक्ष लागवड, व विविध फुलांची लागवड करणे. | ११.०० |
| ५७ | पोलीस मदत केंद्र | १४.१८ |
| ५८ | पर्यटक स्वागत कक्ष | १२.६० |
| ५९ | बेल फुल व हस्तकला विक्री दुकाने | १६६.१४ |
| ६० | चप्पल व बुट स्टँड | १२.६० |
| ६१ | डीजीटल लॉकर रुम | ३७.६० |
| ६२ | ज्योर्तीलींग देवस्थान कार्यालय | १२.६० |
| ६३ | लहान मुलांचे काळजी कक्ष | १५.७५ |
| ६४ | आरोग्य कक्ष | ९.४५ |
| ६५ | तिकीट कक्ष | ६.३० |
| ६६ | व्ही.आय.पी. कक्ष | ४५.३६ |
| ६७ | बस स्टॉप | ४९.६३ |
| ६८ | बारा ज्योर्तीलिंग प्रतिकृती | ६५०.०० |
| ६९ | फंक्शन हॉल | २५.०० |
| ७० | जमीन मोजणी कंटूर मॅप | १०.०० |
| ७१ | डस्टबीन | १२.०० |
| ७२ | डिजीटल लॉकर | २२.५० |
| ७३ | एक्स-रे स्कॅनर, मेटल डिटेक्टर इ. | १८.४५ |
| ७४ | परिसर स्वच्छतेसाठी युरेका फोर्ब्सची मशिनरी | ३४.५५ |
| ७५ | दगडी बँचेस | १५.०० |
| ७६ | ११ केव्ही लाईन टाकणे | १५.०० |
| ७७ | स्मार्ट कार्ड व माहिती पुस्तीका | १५.०० |
| | प्रकल्प किंमत रुपये लाखात | १०४५८.९८ |
| | जी.एस.टी. - (१८ टक्के) | १८८२. ६१ |
| | सादील खर्च (५ टक्के) | ५२२.९५ |
| | आर्किटेक्ट/इलेक्ट्रीलक सल्लागार/ पीएमसी शुल्क (४ टक्के + १८ जी.एस.टी.) | ४९३. ६५ |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत रुपये लाख़ात** | **१३३५८.१९** |

**<u>श्री. क्षेत्र परळी वैजनाथ ज्योतिर्लिंग विकास आराखड्यातील प्रथम टप्प्यातील कामांची यादी.</u>**

**<u>(नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमयुएम-२०१८/प्र.क्र.३४३/नवि-१७, दि. १५.०१.२०१९)</u>**

**विवरणपत्र - "ब"**

| अ. क्र. | विवरण | रक्कम रुपये लाखात |
|---|---|---|
| १ | विविध ठिकाणी सुलभ शौचालयाचे बांधकाम करणे.<br>१. मेरुगिरी पर्वत<br>२. यात्री निवास<br>३. अन्नछत्र जवळ<br>४. दक्षिणण मुखी गणेश मंदिराच्या पठीमागे<br>५. डोंगर तुकाई मंदिर परिसर<br>एकुण बांधकाम क्षेत्रफळ = ६२५.० चौ.मी. | १७०.५० |
| २ | वैद्यनाथ मंदिर भोवताली दगडी फरशी बसवणे.<br>(उत्तर-पुर्व व दक्षिण बाजुस ) एकुण बंधकाम क्षेत्रफळ = ३५००.० चौ.मी. | ६४.२० |
| ३ | नगर पलिकेजवळ सुंदर वास्तुशिल्प असे प्रवेशद्वार बाधणे.<br>(१२.० मी. रुंद, प्रवेशद्वार, ४.५ मी. रुंदीच्या दोन कमानी ) | ४२.८० |
| ४ | मेरु पर्वताभोवती संरक्षण भींत बांधकाम करणे.<br>एकुण लांबी = ४५०.० मी. | २६.४८ |
| ५ | जुन्या तहसील च्या जागेवर धर्मशाला / यात्री निवास बांधकाम व परिसर सुधारणा करणे.<br>वाहन तळ + ४ मजले, ३२० यात्रेकरुंसाठी<br>आकार - १२' x २०' - ८० खोल्या, ४ खाट प्रति खोली. ( स्वच्छतागृहासह )<br>एकुण बंधकाम क्षेत्रफळ = ३२००.० चौ.मी.<br>परिसर सुधारणा क्षेत्रफळ = २०००.० चौ.मी. | १११२.५६ |
| ६ | डोंगर तुकाईदेवी मंदिर येथे भुयारी मार्ग व दोन सुंदर दीपमाळ बांधणे. (काळ्या दगडामध्ये ) भुयारी मार्ग लांबी = ३०.० मी.x ३.० मी. | ६२.७२ |
| ७ | भव्य नंदी | २५.०० |
| ८ | त्रिशूल व डंबरु | ५०.०० |
| ९ | शहरातील मुख्य ४ रस्त्यांवर कमानी तयार करणे. ४ कमानी | ८०.०० |
| १० | १२.० मी. उंचीचे हायमास्ट उभारणे. (वैजनाथ मंदिर परिसरामध्ये १२ ठिकाणी) | ६४.२६ |
| | **१८ % जी.एस.टी.** | **३०५.७३** |
| | **एकूण** | **२००४.२५** |